आदिवासी विकास विभागांतर्गत अनुदानित आश्रमशाळांना अतिरिक्त तुकडीवाढ मंजूर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अआशा-२०२१/प्र.क्र.१०(भाग-१)/का-११**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक:- ०८ मार्च, २०२३

**वाचा:-**

१) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. शाआशा-२००८/प्र.क्र.१०२/का.१३, दि.०२.०८.२००८
२) आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र. अआशा. २०१९/प्र.क्र.१०२/का.११, दिनांक ११.०६.२०१९
३) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे पत्र क्र. अआशा-२०२३/प्र.क्र.६/का.७ (१)/११०२, दि. १४.०२.२०२३. (अनु. आशा. देवळी/मेहुणबारे/सनफुले)
४) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे पत्र क्र. अआशा-२०१९/प्र.क्र.२७/का.७ (१)/२३२५, दि. २१.०३.२०२२. (अनु. आशा. उस्थळे)
५) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे कार्यालयाचे पत्र क्र. अआशा-२०२२/प्र.क्र./ का.७ (१)/ ६९३८, दि. ३०.११.२०२२.

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र राज्यात आदिवासी विकास विभागांतर्गत एकूण ५५६ अनुदानित आश्रमशाळा मंजूर असून स्वंयसेवी संस्थामार्फत सद्यस्थितीत ५३८ अनुदानित आश्रमशाळा कार्यरत आहेत. या अनुदानित आश्रमशाळांमध्ये सर्व निवासी विद्यार्थी हे आदिवासी समाजाचे असतात.

आदिवासी विद्यार्थ्यांसाठी सुरु करण्यात आलेली आश्रमशाळा योजना राबविताना असे लक्षात आले की, बऱ्याच ठिकाणी आश्रमशाळांमधील क्षमता (प्रत्येक वर्गात ४० निवासी व १० अनिवासी विद्यार्थी) पूर्णपणे वापरल्यानंतर देखिल तेथील परीसरात शिक्षण घेऊ इच्छिणाऱ्या बऱ्याच अनिवासी विद्यार्थ्यांना आश्रमशाळांमधुन प्रवेश मिळत नाही. त्यानुषंगाने आदिवासी विभागांतर्गत स्वयंसेवी संस्थामार्फत चालविण्यात येणाऱ्या अनुदानित आश्रमशाळांना दिनांक ०२.०८.२००८ च्या शासन निर्णयान्वये २०० अतिरिक्त तुकडयांना मान्यता देण्यात आली होती. अतिरिक्त तुकडया मंजूर करण्यात आलेल्या अनुदानित आश्रमशाळांमध्ये अतिरिक्त तुकडयांसाठी पुरेशा सोयी-सुविधा उपलब्ध नाहीत तसेच पुरेशी विद्यार्थीसंख्याही उपलब्ध नसल्याने त्यापैकी बऱ्याचशा अतिरिक्त तुकडया सद्यस्थितीत बंद आहेत. अपर आयुक्त (मुख्यालय), आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक यांनी दिनांक ३०.११.२०२२ रोजीच्या पत्रान्वये सादर केलेल्या अहवालानुसार एकूण ३७ अतिरिक्त तुकडया सद्यस्थितीत बंद आहेत.

स्वंयसेवी संस्थाकडून त्यांच्या अनुदानित आश्रशाळेच्या परीसरामध्ये पुरेशाप्रमाणात अनुसूचित जमातीचे विद्यार्थी उपलब्ध असल्याने सदर शाळांना नियमित तुकडयांव्यतिरिक्त अतिरिक्त तुकडीवाढ देण्याची मागणी स्वंयसेवी संस्थाकडून वारंवार करण्यात येत आहे. त्यानुषंगाने आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक तसेच अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/नागपूर/अमरावती यांच्याकडे स्वंयसेवी

संस्थानी अतिरिक्त तुकडयांची मागणी केल्यानुसार राज्यातील अनुदानित आश्रमशाळांना अतिरिक्त तुकडीवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

आदिवासी विकासांतर्गत सेवाभावी संस्थाकडून चालविल्या जाणाऱ्या अनुदानित आश्रमशाळांना संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या इयत्ता १ ली ते इयत्ता १० वी च्या अतिरिक्त तुकडयांपैकी सद्यस्थितीत बंद असलेल्या अतिरिक्त तुकडयांची माहिती अपर आयुक्त (मुख्यालय), आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक यांनी दिनांक ३०.११.२०२२ रोजीच्या पत्रान्वये शासनास सादर केली आहे. त्यानुसार राज्यातील अनुदानित आश्रमशाळांना मंजूर करण्यात आलेल्या २०० अतिरिक्त तुकडयांपैकी आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर यांचे कार्यक्षेत्रांतर्गत मंजूर ४९ तुकडयांपैकी ३७ तुकडया बंद आहेत.

स्वंयसेवी संस्थानी अतिरिक्त तुकडयांची मागणी केल्यानुसार आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक तसेच अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/नागपूर/अमरावती यांचेकडून सादर करण्यात आलेल्या अतिरिक्त तुकडीवाढीच्या प्रस्तावांपैकी खालील विवरणपत्रात नमूद केलेल्या राज्यातील आदिवासी विकास विभागांतर्गत चालविण्यात येणाऱ्या अनुदानित आश्रमशाळांना शैक्षणिक वर्ष सन २०२३-२४ पासून नमूद केल्यानुसार अतिरिक्त तुकडया मंजूर करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | अतिरिक्त तुकडया बंद पडलेल्या संस्थेचे / अनुदानित आश्रमशाळेचे नाव व बंद पडलेल्या तुकडया | बंद तुकडया वाटप केलेल्या संस्थेचे व अनुदानित आश्रमशाळेचे नाव | प्रकल्प अधिकारी व अपर आयुक्त | मंजूरी देण्यात येत असलेल्या अतिरिक्त तुकडया |
|---|---|---|---|---|
| १ | ए.आ.वि.प्र. वर्धा अंतर्गत अनुदानित आश्रमशाळा वडगाव जंगली बंद पडलेल्या इ.७ वी, इ. ८ वी व इ. ९ वी च्या अतिरिक्त तुकडया | शिवाजी शिक्षण प्रसारक मंडळ टाकळी, प्र. दे., ता. चाळीसगाव, जि. जळगाव संचलित अनुदानित आश्रमशाळा देवळी, ता. चाळीसगाव, जि. जळगाव. | प्र.अ. यावल अ.आ. नाशिक | इ. ७ वी, इ. ८ वी व इ. ९ वी (३-तुकडया) |
| २ | ए.आ.वि.प्र. देवरी अंतर्गत अनुदानित आश्रमशाळा, केशोरी बंद पडलेल्या इ.८ वी, इ.९ वी व इ. १० वी च्या अतिरिक्त तुकडया | जय तुळजाभवानी शिक्षण प्रसारक मंडळ, चाळीसगाव, जि. जळगाव संचलित अनुदानित प्राथमिक माध्यमिक आश्रमशाळा, मेहुणबारे, ता. चाळीसगाव, जि. जळगाव. | प्र.अ. यावल अ.आ. नाशिक | इ. ८ वी, इ. ९वी व इ. १० वी (३-तुकडया) |

| अ.क्र. | अतिरिक्त तुकडया बंद पडलेल्या संस्थेचे / अनुदानित आश्रमशाळेचे नाव व बंद पडलेल्या तुकडया | बंद तुकडया वाटप केलेल्या संस्थेचे व अनुदानित आश्रमशाळेचे नाव | प्रकल्प अधिकारी व अपर आयुक्त | मंजूरी देण्यात येत असलेल्या अतिरिक्त तुकडया |
|---|---|---|---|---|
| ३ | ए.आ.वि.प्र. देवरी अंतर्गत अनुदानित आश्रमशाळा, सिरेगावबांध बंद पडलेल्या इ.७ वी व इ.८ वी च्या अतिरिक्त तुकडया | विद्यानंद बहुउद्देशिय ग्रामिण सेवा मंडळ सनफुले, ता. चोपडा, जि. जळगाव संचलित अनुदानित प्राथमिक व माध्यमिक आश्रमशाळा. | प्र.अ. यावल अ.आ. नाशिक | इ. ७ वी व इ. ८ वी (२-तुकडया) |
| ४ | ए.आ.वि.प्र. देवरी अंतर्गत अनुदानित आश्रमशाळा, देवलगाव बंद पडलेल्या इ.८ वी, इ. ९ वी व इ. १० वी च्या अतिरिक्त तुकडया | गुरुकृपा आदिवासी शिक्षण सेवा मंडळ, पेठ, जि. नाशिक संचलित अनुदानित आश्रमशाळा उस्थळे, ता. पेठ, जि. नाशिक. | प्र.अ. नाशिक अ.आ. नाशिक | इ. ८ वी, इ. ९वी व इ. १० वी (३-तुकडया) |
| | **एकूण** | | | **११** |

उपरोक्त प्रमाणे ४ अनुदानित आश्रमशाळांना राज्यातील अनुदानित आश्रमशाळांच्या बंद पडलेल्या तुकडयांपैकी ११ अतिरिक्त तुकडया शैक्षणिक वर्ष सन २०२३-२४ पासून सुरु करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१) राज्यात आदिवासी विकास विभागांतर्गत स्वंयसेवी संस्थामार्फत चालविल्या जाणाऱ्या अनुदानित आश्रमशाळेसंदर्भातील शासनाचे वेळोवेळी विहित करण्यात येणारे अधिनियम, नियम, आदेश व अटींचे तंतोतंत पालन करणे संबंधित संस्थेस बंधनकारक राहील.

२) सदर अतिरिक्त तुकडयांसाठी अनुज्ञेय देय होणारे अनुदान व शिक्षकांची पदे मंजूर करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३) उपरोक्त अतिरिक्त तुकडयांसाठी अनुज्ञेय शिक्षकांची नियुक्ती करण्यास मान्यता देण्यात येत आहे. अशी मान्यता देण्यापूर्वी अपर आयुक्त यांनी शासन निर्णय दिनांक ११ जून, २०१९ अन्वये देण्यात आलेल्या सूचनांचे पालन करावे तसेच आयुक्त आदिवासी विकास, नाशिक यांचेशी संपर्क साधुन राज्यातील अनुदानित आश्रमशाळांमधील अतिरिक्त ठरलेले कोणतेही शिक्षक समायोजनासाठी शिल्लक नाहीत अशा प्रकारचे त्यांचे ना-हरकत प्रमाणपत्र घेऊनच शिक्षकांच्या नियुक्तीस मान्यता देण्यात यावी.

४) प्रत्येक अतिरिक्त तुकडीत ४० निवासी विद्यार्थ्यांना शासनाच्या प्रचलित नियमाप्रमाणे प्रवेश देण्यात यावा.

५) प्रचलित नियमानुसार प्राथमिक/माध्यमिक आश्रमशाळांतील अतिरिक्त तुकडयांकरीता अनुज्ञेय असणाऱ्या (वेतन खर्चाच्या ८ टक्के व १२ टक्के) आकस्मिक खर्चास याव्दारे मंजूरी देण्यात येत आहे.

६) अतिरिक्त तुकडयांतील मुलांचे जेवण तयार करण्यासाठी शासन निर्णय दिनांक २६ सप्टेंबर, २०१८ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

७) सदर अतिरिक्त तुकडयांच्या अनुषंगाने शासनाकडे अथवा आदिवासी विकास विभागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडे तक्रारी प्राप्त झाल्यास अथवा अतिरिक्त तुकडीच्या संदर्भातील अटी व शर्तींचा भंग झाल्याचे निदर्शनास आल्यास सदरची मंजूरी रद्द करण्याचे अधिकार शासनास राहतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०४१११३२८५२१२२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

UDAY GANPAT GAWAS

Digitally signed by UDAY GANPAT GAWAS
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=d99ad92d2ef92f97f483127c546b50d831cbc0858b00a86d17202dbe2e19d646, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9CE356F38C6A70A8FFDE299AD6627F48BD01E875A7ACA38BD139B0CC5367E62D, cn=UDAY GANPAT GAWAS
Date: 2023.04.11 13:33:47 +05'30'

**( उदय ग. गवस )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रतः-**

१) मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. अपर मुख्य सचिव, आदिवासी विकास यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
४) अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/नागपूर/अमरावती
५) शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
७) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
८) सह संचालक, लेखा व कोषागरे, संगणक कक्ष, नविन प्रशासकीय इमारत, ५ वा मजला, मंत्रालय.
९) सर्व संबंधित प्रकल्प अधिकारी, आदिवासी एकात्मिक प्रकल्प विकास.
१०) सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी (प्रकल्प अधिकारी यांचे मार्फत)
११) सर्व संबंधित शिक्षण अधिकारी (प्राथमिक/माध्यमिक),जिल्हा परिषद (प्रकल्प अधिकारी यांचे मार्फत)
१२) सर्व संबंधित विभागीय शिक्षण उपसंचालक, (प्रकल्प अधिकारी यांचे मार्फत)
१३) अध्यक्ष/सचिव, शिवाजी शिक्षण प्रसारक मंडळ टाकळी, प्र.दे., ता. चाळीसगाव, जि. जळगाव.
१४) अध्यक्ष/सचिव, जय तुळजाभवानी शिक्षण प्रसारक मंडळ, चाळीसगाव, जि. जळगाव.
१५) अध्यक्ष/सचिव, विद्यानंद बहुउद्देशिय ग्रामिण सेवा मंडळ सनफुले, ता. चोपडा, जि. जळगाव.
१६) अध्यक्ष/सचिव, गुरुकृपा आदिवासी शिक्षण सेवा मंडळ, पेठ, जि. नाशिक.
१७) निवडनस्ती (का.११).